**सातारा जिल्ह्यातील सातारा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्ता दर्जोन्नत करून प्रमुख जिल्हा मार्ग रस्त्यामध्ये सामाविष्ट करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१९/प्र.क्र.०८/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक-११ फेब्रुवारी, २०१९**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/२०/३९४/२०१९ दि. २१/०१/२०१९.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सातारा जिल्ह्यातील सातारा तालुक्यातील सातारा - कास - बामणोली - गोगवे - तापोळा - महाबळेश्वर रस्ता (प्रमुख जिल्हा मार्ग-२६) या रस्त्यामध्ये प्रमुख जिल्हा मार्ग -२६ ते कासाणी फाटा ते घाटाई देवी रस्ता ते प्रमुख जिल्हा मार्ग -२६ रस्ता (इतर जिल्हा मार्ग -५९) हा ८.०० कि.मी. लांबीचा रस्ता दर्जोन्नत करून सामाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, सातारा यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सातारा तालुक्यातील कास धरणाची उंची वाढविण्याचे काम सद्या प्रगतीत आहे. सदर धरणाची उंची वाढविल्यानंतर प्रमुख जिल्हा मार्ग-२६ या रस्त्याची १९/४०० ते २४/३०० ही लांबी बाधीत होणार आहे. तसेच रस्त्याची सलगता खंडीत होणार आहे. या बाधीत होणा-या लांबी करीता पर्यायी मार्ग करणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेता प्रमुख जिल्हा मार्ग-२६ या रस्त्यामध्ये प्रमुख जिल्हा मार्ग -२६ ते कासाणी फाटा ते घाटाई देवी रस्ता ते प्रमुख जिल्हा मार्ग -२६ रस्ता (इतर जिल्हा मार्ग -५९) हा ८.०० कि.मी. लांबीचा रस्ता दर्जोन्नत करून सामाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, सातारा यांची मागणी विचारात घेऊन सातारा जिल्ह्यातील सातारा तालुक्यातील सातारा - कास - बामणोली - गोगवे - तापोळा - महाबळेश्वर रस्ता (प्रमुख जिल्हा मार्ग-२६) या रस्त्यामध्ये प्रमुख जिल्हा मार्ग -२६ ते कासाणी फाटा ते घाटाई देवी रस्ता ते प्रमुख जिल्हा मार्ग -२६ रस्ता (इतर जिल्हा मार्ग -५९) हा ८.०० कि.मी. लांबीचा रस्ता दर्जोन्नत करून सामाविष्ट येत आहेत. परिणामी, प्रमुख जिल्हा मार्ग-२६ या रस्त्याचे नामाभिधान **सातारा - येवतेश्वर - पेट्री - घाटाईदेवी फाटा - घाटाईदेवी मंदिर - कास - बामणोली - गोगवे - तापोळा - महाबळेश्वर रस्ता (प्रमुख जिल्हा मार्ग -२६) (१०८.८५०) कि.मी.** असे होईल.

तसेच रस्ते विकास योजना २००१-२१ मधील सातारा जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **८.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२४५६.६१० + ८.००) म्हणजेच **२४६४.६१० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **८.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (२०४९.६१० - ८.००) म्हणजेच **२०४१.६१० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१११२४१३९५०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2019.02.11 12:44:09 +05'30'

**( स्वरूप रायपुरे )**
उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी,
महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,सातारा.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सातारा (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.